**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेचा निधी वितरीत करण्यासाठी SNA SPARSH कार्यपध्दतीबाबत राज्य संलग्नित योजनानिहाय भारतीय रिझर्व्ह बँक येथे स्वतंत्र आहरण खाते उघडण्यास मान्यता देण्याबाबत तसेच, याकरीता समन्वय अधिकारी व एकल समन्वय यंत्रणा यांची नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०२५/प्र.क्र.४/एस.डी.-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: २५ मार्च, २०२५

संदर्भ:-

१) भारत सरकार, वित्त मंत्रालय, व्यय विभाग, सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली कार्यालयीन ज्ञापन दि.१३/०७/२०२३

२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२३/ प्र.क्र. ४७/कोषा प्रशा-४ दि.०३/०८/२०२३.

३) भारत सरकार, वित्त मंत्रालय, व्यय विभाग, सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली कार्यालयीन ज्ञापन दि.२१/०५/२०२४

४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र. ४७/कोषा प्रशा-४ दि.११/०६/२०२४.

५) वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५१, कोषा प्रशा-४, दि.१०/१०/२०२४.

६) वित्त विभाग शासन परिपत्रक्र क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५१/कोषा प्रशा-४, दि.११/१०/२०२४.

७) केंद्र शासन, वित्त विभाग, सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली शाखा यांचे पत्र दि.०४/१०/२०२४.

८) महालेखापाल (ले व अ.), महाराष्ट्र-१, मुंबई कार्यालयाकडील अनौपचारिक संदर्भ क्र.ख.वि/चा-१/शालेय शिक्षण व क्रीडा विभाग/युओआर-३३०/२०२४-२५/२३६५, दि.०५/०३/२०२५.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासन व राज्य शासन या दोन्ही स्तरांवरील रोख व्यवस्थापनामध्ये (Cash Management) अधिक परिणामकारकता साध्य करण्यासाठी सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS), राज्याची एकात्मिक वित्तीय व्यवस्थापन माहिती प्रणाली (State IFMIS) आणि भारतीय रिझर्व्ह बँकेची ई-कुबेर प्रणाली (e-Kuber) यांच्या एकात्मिक रचनेच्या (Integrated Framework) माध्यमातून केंद्र पुरस्कृत योजनांचा निधी वितरीत करण्यासाठी 'SNA-SPARSH' (समयोचित प्रणाली एकीकृत शीघ्र हस्तांतरण - Real Time System of Integrated Quick Transfers) ही पर्यायी निधी प्रवाह कार्यपध्दती (Alternative Fund Flow Mechanism) टप्या-टप्याने प्रस्तावित करण्याचा निर्णय केंद्र शासनाने दि.१३ जुलै, २०२३ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनान्वये घेण्यात आला आहे.

प्रस्तुत प्रणालीमध्ये महाराष्ट्र राज्यातील २६ केंद्र पुरस्कृत योजनांकरीता एकूण ६९ राज्य संलग्नित योजना [State Linked Scheme (SLSs)] साठी भारतीय रिझर्व्ह बँक येथे प्रत्येकी एक आहरण खाते (Drawing Account) उघडण्यास वित्त विभागाच्या दि.१० ऑक्टोंबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तथापि, केंद्र शासनाने दि.०४ ऑक्टोंबर, २०२४ रोजीच्या पत्रान्वये प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेचा समावेश 'SNA-SPARSH' प्रणालीमध्ये केलेला आहे. त्यानुषंगाने सदर योजनेंतर्गत राज्य संलग्नित योजना [State Linked Scheme (SLSs)] निहाय भारतीय रिझर्व्ह बँकमध्ये आहरण खाते(Drawing Account) उघडणे आवश्यक आहे. सदर योजनेंतर्गत खालीलप्रमाणे तीन राज्य संलग्नित योजना कार्यरत आहेत.

| अ.क्र. | योजनेचे नाव | चार अंकी केंद्र योजना सांकेतांक | राज्य संलग्नित योजनेचा सांकेतांक आणि नाव | बाब |
|---|---|---|---|---|
| १. | प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजना (पूर्वीची शालेय पोषण आहार योजना) | ९१६५ | MH-7-MH-NATIONAL PROGRAMME OF MID DAY MEAL IN SCHOOLS (MDM) | Recurring shareable components Central::State Share (60:: 40) |
| २. | | | MH-659 - PM-POSHAN - Non Recurring sharable components | Non-recurring shareable components Central::State Share (60:: 40) |
| ३. | | | MH-658 - PM-POSHAN - Recurring non sharable components | Recurring non-shareable components (100% Central share) |

भारतीय रिझर्व्ह बँक येथे आहरण खाते उघडण्याकरीता वित्त विभागाने शासन निर्णय दि.११ ऑक्टोंबर, २०२४ अन्वये कार्यपध्दती निश्चित केली आहे. त्यानुषंगाने सदर योजनेंतर्गत राज्य संलग्नित योजनानिहाय भारतीय रिझर्व्ह बँक येथे प्रत्येकी एक स्वतंत्र आहरण खाते उघडण्यास मान्यता देण्याची तसेच, सदर प्रयोजनार्थ समन्वय अधिकारी (Nodal Officer) व एकल समन्वय यंत्रणा ( Single Nodal Agency) यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत भारतीय रिझर्व्ह बँक येथे राज्य संलग्नित योजनानिहाय प्रत्येकी एक स्वतंत्र आहरण खाते (Drawing Account) उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. तसेच, सदर योजनेंतर्गत राज्य संलग्नित योजनानिहाय SNA SPARSH या कार्यपध्दतीच्या प्रयोजनार्थ खालीलप्रमाणे समन्वय अधिकारी (Nodal Officer) व एकल समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency) यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव | राज्य संलग्नित योजनेचा सांकेतांक आणि नाव | समन्वय अधिकारी (Nodal Officer) | एकल समन्वयक यंत्रणा ( Single Nodal Agency) |
|---|---|---|---|---|
| १. | ९१६५- प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजना (पूर्वीची शालेय पोषण आहार योजना) | MH-7-MH-NATIONAL PROGRAMME OF MID DAY MEAL IN SCHOOLS (MDM) | सह/उप सचिव (विद्यार्थी विकास), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई | शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य,पुणे. |
| २. | | MH-659 - PM-POSHAN - Non Recurring sharable components | | |
| ३. | | MH-658 - PM-POSHAN - Recurring non sharable components | | |

३. केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन याबाबत केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.१३ जुलै, २०२३ व दि.२१ मे, २०२४ अन्वये निर्देश दिलेले आहेत. तसेच, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि.११ ऑक्टोंबर, २०२४ अन्वये राज्य संलग्नित योजनानिहाय भारतीय रिझर्व्ह बँक येथे आहरण खाते उघडण्यासाठी कार्यपध्दती निश्चित केली आहे. सदर कार्यपध्दती तसेच, शासनाच्या प्रचलित नियमानुसार प्रस्तुत विषयाच्या अनुषंगाने आवश्यक ती

पुढील कार्यवाही एकल समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency) यांनी करावी.

४. सदर आदेश महालेखापाल कार्यालयाच्या संदर्भाधिन दि.०५ मार्च, २०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस तसेच, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०/२०२५/कोषा-प्रशा ४ दि.२१ मार्च, २०२५ अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२५१५२१४०४८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=68D5A8ABFFDD75CBA24301AA39C12B40983F304D7267796A32B42D4D558F1A1F, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2025.03.25 15:23:09 +05'30'

**(प्रमोद पाटील)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
६) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
९) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१५) शिक्षणाधिकारी (बृहन्मुंबई), बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई

१६) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)

१७) शिक्षणाधिकारी (योजना), जिल्हा परिषद (सर्व)

१८) नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई

१९) वित्त विभाग (व्यय-५ व कोषाप्रशा-४), मंत्रालय, मुंबई

२०) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई

२१) निवड नस्ती - एस.डी. ३